**राष्ट्रीय व राज्य पातळीवरील क्रीडा स्पर्धेत सहभागी होणाऱ्या खेळाडू विद्यार्थ्यांना शाळेत उपस्थितीमध्ये सवलत देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण - २०१६/ प्र.क्र. १८५ / एसडी-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. एसएससी - २०१२ /(१५४/१२) / उमाशि - २ दिनांक २१ एप्रिल, २०१५
२) केंद्र शासनाचे क्रीडा विभागाचे पत्र दि. १२/८/२०१६

**प्रस्तावना:-**

राज्यात क्रीडा संस्कृतीचे संर्वधन, प्रचार, प्रसार व जोपासना करण्यासाठी पोषक वातावरण असण्याच्या दृष्टीने राज्याचे क्रीडा धोरण २०१२ जाहीर करण्यात आले आहे. प्रस्तुत धोरणातील शिफारस क्रमांक ३.१ ही खेळाडूंना प्रोत्साहन, सवलती व गौरव या बाबीशी निगडीत आहे. राज्यात क्रीडा संस्कृती वाढीस लागण्यासाठी शालेय जीवनापासूनच खेळाडू विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. या हेतूने विद्यार्थ्यांसाठी तालुका / जिल्हा / विभाग / राज्य व राष्ट्रीय स्तरावरील स्पर्धांचे आयोजन राज्य / केंद्र शासनामार्फत करण्यात येते. सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी तसेच पूर्व तयारीसाठी खेळाडू विद्यार्थ्यांच्या शाळेतील दैनंदिन उपस्थितीमध्ये घट होते.उपस्थितीच्या मुद्यामुळे त्याचे शैक्षणिक वर्षाचे नुकसान होण्याच्या भितीने अनेक प्रतिभावान खेळाडू विद्यार्थी प्रस्तुत स्पर्धांमध्ये सहभागी होत नसल्याच्या बाबी निदर्शनास येत आहेत. याचा विपरित परिणाम समाजमनात क्रीडा संस्कृती रूजविणे तसेच, सदर विद्यार्थ्यांमधील उपजत क्रीडा गुण जोपसण्यावर होत आहे.

शालेय जीवनात राष्ट्रीय/राज्य स्तरावरील क्रीडा स्पर्धामध्ये निवड होणाऱ्या खेळाडूंना त्यांच्या शाळेतील दैनंदिन उपस्थितीमध्ये सवलत दिल्यास त्यांना सदर स्पर्धेची विनातणाव पूर्व तयारीसाठी आवश्यक कालावधी मिळेल व त्याच्याकडून निश्चितच प्रस्तुत स्पर्धेत चांगली कामगिरी होईल. केंद्रीय माध्यमिक शिक्षा मंडळाने (सेंट्रल बोर्ड ऑफ सेकंडरी एज्युकेशन) राष्ट्रीय क्रीडा स्पर्धांमध्ये निवड होणाऱ्या खेळाडूंना संबधित शैक्षणिक वर्षात त्यांच्या शाळेतील दैनंदिन उपस्थितीमध्ये ७५ % वरून ६०% इतकी सवलत दिलेली आहे.

सद्यस्थितीत शालेय विद्यार्थ्यांस त्यांची शाळेतील दैनंदिन उपस्थिती ७५ % अनिवार्य आहे. तथापि, राष्ट्रीय स्पर्धेत भरीव यश मिळवून राज्याच्या देदिप्यमान क्रीडा परंपरेत भर घालण्याच्या दृष्टीने केंद्रीय माध्यमिक शिक्षा मंडळाच्या धर्तीवर राज्यातील सर्व माध्यमाच्या व सर्व मंडळाशी संलग्नित असलेल्या शाळेतीत इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी मधील राष्ट्रीय व राज्य क्रीडा स्पर्धामध्ये निवड होणाऱ्या खेळाडू विद्यार्थ्यांना त्यांच्या शाळेतील दैनंदिन उपस्थितीमध्ये सवलत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील सर्व माध्यमाच्या व सर्व मंडळाशी संलग्नित असलेल्या शाळामधील इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी मधील ज्या विद्यार्थ्यांची "राष्ट्रीय/राज्य क्रीडा स्पर्धामध्ये" निवड होईल अशा विद्यार्थ्यांना सदर स्पर्धेची पूर्व तयारी करणे, स्पर्धेच्या ठिकाणी जाण्यासाठी लागणारा प्रवासाचा कालावधी, स्पर्धा कालावधी इ. बाबी विचारात घेवून प्रस्तुत खेळाडू विद्यार्थ्यांची संबधित शैक्षणिक वर्षातील त्यांच्या शाळेतील दैनंदिन उपस्थिती किमान ६०% पर्यंत असल्यास ती ग्राह्य धरण्यात यावी. अपवादात्मक परिस्थितीत संबधित खेळाडू विद्यार्थ्यांची शाळेतील दैनंदिन उपस्थिती किमान ६०% पेक्षा कमी असल्यास त्यास संबंधित जिल्हा शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) यांच्या पूर्व परवानगीने वार्षिक परीक्षेस बसण्याची अनुमती द्यावी. सदर पूर्व परवानगी घेण्याची जबाबदारी संबधित शाळेच्या मुख्याध्यापकांची राहील. तसेच अशा विद्यार्थ्यांच्या पालकांनी त्यांचा पाल्य कोणत्या राष्ट्रीय / राज्य क्रीडा स्पर्धांमध्ये सहभागी होणार आहे / झाला आहे, याबाबतचा आवश्यक तपशील शाळेतील मुख्याध्यापकांकडे देणे अनिवार्य राहील.

सदर सवलत केंद्र / राज्य शासन, केंद्र / राज्य शासन मान्यताप्राप्त क्रीडा संघटना, भारतीय शालेय खेल महासंघ (School Games Federation of India) यांच्या मार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या राष्ट्रीय व राज्य स्तरावरील क्रीडा स्पर्धांसाठी लागू राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१११६१५०४५५४९२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2016.11.16 15:07:13 +05'30'

**( डॉ. सुवर्णा सि. खरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मा. मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा. शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. मा. क्रीडा आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
९. विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक विभागीय शिक्षण मंडळ (सर्व).
१०. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
११. सर्व शिक्षणाधिकारी ,(माध्यमिक), सर्व जिल्हा परिषद,
१२. सर्व शिक्षण निरीक्षक, शिक्षण विभाग
१३. सर्व माध्यमिक शाळांचे मुख्याध्यापक
१४. निवडनस्ती, एसडी-२.